**मराठी भाषा विभाग (खुद्द) साठी बाह्य यंत्रणेकडून शिपाई पुरविण्यासाठी दिनांक ०३.१२.२०१९ ते ३०.११.२०२० या कालावधीसाठी दरकरार करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३२/आस्था-१**
८ वा मजला, नविन प्रशासन भवन,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१९

वाचा :- १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. पदनि २०१०/८४/वि,सु -१, दिनांक २७.९.२०१०.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.पदनि २०१३/प्र.क्र.११/१३/विसु-१, दिनांक ०२.०२.२०१३
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय़ क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/कामगार-८ दिनांक १८.०६.२०१४
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचे पत्र दिनांक ११.०९.२०१७
५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक,क्रमांक-संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३/कामगार-८ दिनांक २२.०२.२०१९

**शासन निर्णय-**

मराठी भाषा विभाग (खुद्द) करीता संदर्भ क्रमांक २ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक०२.०२.२०१३ व उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्रमांक-३ येथील शासन निर्णयात नमूद तरतूदीनुसार विभागास शिपाई पुरविण्याबाबत मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्व्हीसेस प्रा.लि.व मे.ब्रिक्स फॅसिलिटीज प्रा.लि.या संस्थेकडून दरपत्रक मागविण्यात आले. त्याअनुषंगाने मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्व्हीसेस प्रा.लि.,नंबर-१७, क्रिस्टल हाऊस, डॉ.मनकीकर मार्ग, सायन, मुंबई-४०० ०२२ या संस्थेची निवड करण्यात येत आहे.

२. मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्व्हीसेस प्रा.लि.संस्थेने मराठी भाषा विभाग (खुद्द), मंत्रालय, मुंबई-३२ येथे दिनांक ०३.१२.२०१९ ते ३०.११.२०२० या कालावधीसाठी खालील नमूद केलेल्या दराप्रमाणे व अटी व शर्तीनुसार या विभागास शिपाई पुरविणे बंधनकारक राहील.

शिपाई पदाचे दर

अ) शिपायांच्या वेतनाचा मासिक ठोक दर रु.२०,१००/- (रुपये वीस हजार शंभर रुपये फक्त)

| | | |
|---|---|---|
| १) | सायंकाळी ७.०० ते ८.०० वाजेपर्यंत | रु.२४/- |
| २) | रात्री ८.०० ते ९.०० वाजेपर्यंत | रु.३०/- |
| ३) | रात्री ९.०० वाजल्यानंतर | रु.४०/- |

## अटी व शर्ती

१) उमेदवार भारतीय नागरिक असावा तसेच त्याची अर्हता किमान चौथी पास अशी असावी. त्याला मराठी लिहिता, वाचता, बोलता येणे आवश्यक आहे.

२) उमेदवाराचे वय १८ ते ४० वर्षे या दरम्यान असावे.

३) उमेदवाराजवळ आधार कार्ड/निवडणूक ओळखपत्र/पॅनकार्ड यापैकी एखादे ओळखपत्र असावे.

४) संस्थेतर्फे पुरविण्यात येणारा शिपाई गुन्हेगारी पार्श्वभूमीचा किंवा प्रवृत्तीचे नसावेत. याबाबतचे स्वयंघोषणापत्र उमेदवार तसेच संबंधित संस्थेने दाखल करणे आवश्यक राहील.

५) दुर्देवाने उमेदवारास गंभीर स्वरुपाची इजा झाल्यास वैद्यकीय खर्चाचे अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनाकडे राहणार नाही. त्याची जबाबदारी संबंधित संस्थेची राहील.

६) संदर्भ क्र.०५ येथील उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दिनांक २२.०२.२०१९ च्या शासन परिपत्रकात नमूद तरतुदीनुसार शासनाने निर्धारित केलेल्या वेतनदारप्रमाणे वेतन तसेच वेळोवेळी लागू असलेले कर व अनुज्ञेय भत्ते अदा करणे संस्थेस बंधनकारक राहील. उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळाला देय असलेल्या कायदेशीर आर्थिक दायित्व वेतनात अंतर्भूत असून संबंधित प्राधिकरणाकडे कायदेशीर दायित्व जमा करण्याची जबाबदारी संस्थेची राहील. मागणीनुसार याबाबतची कागदपत्रे वेळोवेळी मराठी भाषा विभागाकडे जमा करणे संस्थेवर बंधनकारक राहील. याबाबत मराठी भाषा विभागाकडे कोणतेही दायित्व राहणार नाही.

७) मागणी केलेल्या कालावधीसाठी उमदेवार उपलब्ध होवू शकत नसेल अशावेळी संस्थेमार्फत पर्यायी व्यवस्था मान्य अटींसह करण्यात यावी. अन्यथा दंडात्मक शुल्क आकारण्यात येईल.

८) प्रत्येक दिवसाच्या कामकाजाचा कालावधी सकाळी ९.३० ते सायंकाळी ६.०० असा राहील. (८.३० तास) यासाठी संबंधित उमेदवाराने त्याची कार्यालयात येण्याची व कार्यालय सोडण्याची वेळ याबाबत मराठी भाषा विभागाच्या आस्थापना शाखेत ठेवण्यात येणाऱ्या नोंदवहीत नोंद करणे आवश्यक राहील. या व्यतिरिक्त जादा कामासाठी शासन निर्णयात नमूद दराने भत्ते देय राहील.

९) मनुष्यबळाच्या सेवा पुरविण्याबाबत रु.२००/- च्या स्टॅम्प पेपरवर शासनाशी एक वर्षाचा करार करणे आवश्यक राहील.

१०) शासनाच्या आवश्यकतेनुसार विशिष्ट कालावधीसाठी उमेदवाराची मागणी केली जाईल.

११) शासकीय नियमानुसार सुट्टया अनुज्ञेय असतील. तसेच आवश्यकता असल्यास सुट्टीच्या दिवशीही कामावर यावे लागेल.

१२) कराराचे पालन समाधानकारकपणे न झाल्यास करार केव्हाही संपुष्टात आणणे. तसेच कराराची मुदत शासनास आवश्यकता वाटल्यास वर्षभरापर्यंत (१ वर्ष) आणखी वाढविणे याबाबतचा अंतिम निर्णय मराठी भाषा विभागाचा राहील.

३. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडएफ-०१, २०५२-सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा, (०९०) सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा, (०९०) सेक्रेटरिएट (००) (०१) मराठी भाषा विभाग, (१३) कार्यालयीन खर्च (२०५२ ५०५४) या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग शासन निर्णय, क्रमांक-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम/भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९११३०१२२६०५११३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Harshwardhan
Tukaram Jadhav

Digitally signed by Harshwardhan Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2fe6cc4558c2e6d7354de29414546a527c688fec225545f57e427d7b0bbfc51, serialNumber=9ae068ea61a07283211a87c7bc808b58ebcff5fc50cc2738a19dfcbf7d81dfb8, cn=Harshwardhan Tukaram Jadhav
Date: 2019.11.30 12:34:11 +05'30'

**( हर्षवर्धन तु. जाधव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-.१,मुंबई
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. कक्ष अधिकारी (रोखशाखा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
६. कक्ष अधिकारी, वित्त विभाग ( वित्तीय सुधारणा / विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७. मे.क्रिस्टल इंटिग्रेडेट सर्विसेस प्रा. लि.नं.१७, क्रिस्टल हाऊस, डॉ. मनकीकर मार्ग, सायन, मुंबई-४०० ०२२.
८. निवड नस्ती.